**मिरा-भाईंदर महानगरपालिका स्थायी समिती सभेने दि.१६.०३.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र. १०२, हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अन्वये, अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- मिभाम-११२१/प्र.क्र.९८/नवि-२८**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- १३ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ**:-१) मिरा-भाईंदर महानगरपालिका स्थायी समिती सभा ठराव क्र. १०२, दि.१६.०३.२०२०.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था/९९४/२०२१-२२, दि.३०.०७.२०२१
३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था/३३९३/२०२१-२२, दि.१४.०२.२०२२
४) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मनपा/आस्था/१२५१/२०२२-२३, दि.०७.०९.२०२२
५) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. मिभाम-११२१/प्र.क्र.९८/नवि-२८, दि. २२.०५.२०२४.
६) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे पत्र क्र.मिभा/मनपा/आस्था/१६२५/२०२४-२५, दि.३०.०८.२०२४.

**प्रस्तावना**:-

श्री. सचिन चवाथे, जनसंपर्क अधिकारी, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी एकाच पदासाठी दोन स्वतंत्र अर्ज करून दोन्ही अर्जासोबत वेगवेगळ्या शैक्षणिक अर्हतेचे व बनावट/खोटी प्रमाणपत्र स्वत:चे फायद्यासाठी दाखल करून, त्यांनी महानगरपालिकेची फसवणक केल्याने त्यांना दि.०२.०८.२०११ रोजी महानगरपालिकेच्या सेवेतून बडतर्फ करण्यात आले. श्री. चवाथे यांची सेवा पुनर्स्थापित करण्याबाबत स्थायी समितीने कोणत्याही कायदेशीर बाबींचा व कागदोपत्री पुराव्याचे अवलोकन न करता ठराव क्र.१०२, दि.१६.०३.२०२० अन्वये पारीत केलेला आहे.

**२.** श्री. चवाथे यांचे बाजूने कोणत्याही तर्काशिवाय त्यांना नोकरीत पुनर्स्थापित करण्याबाबतचा स्थायी समितीचा दि.१६.०३.२०२० चा ठराव क्र. १०२ हा कोणत्याही कायदेशीर बाबींचा व कागदोपत्री पुराव्याचे अवलोकन न करता केलेला आहे. स्थायी समितीने दि.१६.०३.२०२० रोजी पारीत ठराव क्र. १०२ हा महानगरपालिकेच्या आर्थिक, प्रशासकीय तसेच, व्यापक लोकहिताच्या विरूध्द असल्याने, आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ नुसार विखंडीत करण्याची शासनास विनंती केली होती.

**३.** मिरा-भाईंदर महानगरपालिका स्थायी समिती सभेने दि.१६.०३.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र.१०२, हा महानगरपालिकेच्या आर्थिक, प्रशासकीय तसेच, व्यापक लोकहिताच्या विरोधात असल्याने, सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (१) अन्वये दि.२२.०५.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रथमत: निलंबित करण्यात आला होता. सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३० दिवसाच्या विहीत मुदतीत संबंधितांना अभिवेदन करण्याची संधी देण्यात आली होती. त्यानुसार आयुक्त, मिरा-भाईंदर

महानगरपालिका व श्री. सचिन चवाथे (जनसंपर्क अधिकारी, सेवेतून बडतर्फ) यांचेकडून अभिवेदन प्राप्त झाले.

**४.** आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी उक्त ठरावाच्या विखंडनाकरीता नमूद केलेली कारणमीमांसा विचारात घेता, सदर ठराव महानगरपालिकेच्या प्रशासकीय तसेच, व्यापक लोकहिताच्या विरोधात असल्याने, मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने दि.१६.०३.२०२० रोजी पारित केलेला ठराव क्र.१०२, हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय-:</u>**

आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी संदर्भीय पत्रांत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, श्री. सचिन चवाथे (जनसंपर्क अधिकारी, सेवेतून बडतर्फ) यांना पुन्हा कामावर हजर करून घेण्याबाबत मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने प्रशासनाच्या विरूध्द जाऊन दि.१६.०३.२०२० रोजी पारीत केलेला ठराव क्र.१०२, हा महानगरपालिकेच्या प्रशासकीय तसेच, व्यापक लोकहिताच्या विरोधात असल्याचे स्पष्ट होत असल्याने, तो महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम-४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

**२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २०२५०२१३१५३१५७५१२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2025.02.13 15:32:56 +05'30'

**(सुशिला पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. उप मुख्यमंत्री (नगर विकास) महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि २), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
४) उप सचिव (नवि-२८), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८)